प्रधान शीर्ष - ००४५, विक्रेय वस्तू व सेवा यावरील इतर कर व शुल्क.

१०५ [दोन] हॉटेल व निवासगृहे यांच्यातील निवास व्यवस्थेवरील कर या उपशीर्षामध्ये सुधारणा करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक एलटीआर-११९२/प्र.क्र.१६७/९२/कराधान-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ६ मार्च १९९३.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्यामध्ये हॉटेल्स आणि निवासगृहे यांच्यामधील निवासी व्यवस्थेवर ऐषआराम कर लागू करण्याचा निर्णय झाल्यानंतर सन १९७४ पासून प्रधानशीर्ष ००४५, खाली उपशीर्ष १०५ अन्वये हॉटेल व निवासगृहे यांच्यामधील निवास व्यवस्थेवरील ऐषआराम कराची जमा रक्कम नोंदविण्यात येत आहे.

तथापि, सन १९७४ च्या ऐषआराम कर अधिनियमाऐवजी शासनाने अंमलात आणलेल्या सन १९८७ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ६१ म्हणजेच महाराष्ट्र [हॉटेल व निवासगृहे यामधील] ऐषआरामावरील कर अधिनियम, १९८७ च्या कलम २[जी] अन्वये हॉटेलमधील ऐषआरामाच्या व्याख्येनुसार हॉटेलमधील ऐषआरामाच्या बाबींमध्ये निवासव्यवस्थेव्यतिरिक्त वातानुकूलीत सेवा, दूरध्वनी, दूरचित्रवाणी, संगीत तथा खाद्येय अशा प्रकारच्या इतर बाबींचा सुध्दा ऐषआरामाच्या बाबी म्हणून समावेश केलेला आहे. परिणामत: उपशीर्ष १०५ [दोन] मधील "हॉटेल व निवासगृहे यांच्यातील निवास व्यवस्थेवरील कर" या मजकूरामध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे. तदनुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

शासन निर्णय :-

"प्रधान शीर्ष ००४५ - विक्रेय वस्तु व सेवा यावरील इतर कर व शुल्क" या खालील विद्यमान उपशीर्ष १०५ [दोन] यांमध्ये खाली दर्शविल्याप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

क्र.मा...

| विद्यमान उपशीर्ष | सुधारीत उपशीर्ष |
| --- | --- |
| १०५ [दोन] हॉटेल व निवासगृहे यांच्यातील निवासव्यवस्थेवरील कर. | १०५ [दोन] हॉटेल व निवासगृहे यामध्ये पुरविण्यात येणा-या ऐषआरामाच्या बाबींवरील कर. |

वरील सुधारणा आर्थिक वर्ष सन १९९३-९४ पासून लागू करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ वि. प्र. कुळकर्णी ]
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी अग्रेषित .

१. महालेखापाल [लेखा परीक्षा]-एक, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता]-एक, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल [लेखा परीक्षा]-दोन, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता]-दोन, महाराष्ट्र, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा, मुंबई.
७. विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, मुंबई.
८. अवर सचिव, अर्थसंकल्प-७, प्रशासन-४.
९. निवड नस्ती, कराधान-१.